GR-200404171246270001-0100

पदोन्नती

गोपनीय अभिलेखांच्या प्रतवारीचे निकष

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय- क्रमांक : एसआरव्ही-२००२/प्र.क्र.२०/०२/१२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ डिसेंबर, २००२.

वाचा : - (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक ईएसबी-११८९/९०-८९/१३,
दिनांक ३१ जानेवारी, १९९०.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८८/प्र.क्र.११/(८८)/१२,
दिनांक २१ फेब्रुवारी, १९९४
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८८/प्र.क्र.११/(८८)/१२,
दिनांक २२ सप्टेंबर, १९९४

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन क्रमांक २ येथील दि. २१ फेब्रुवारी,१९९४ च्या शासन निर्णयान्वये गट-अ मधील पहिल्या टप्प्यापर्यंतच्या पदांवर तसेच गट-अ मधील पुढील टप्प्यांवरील पदांवर पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालांच्या सरासरी प्रतवारीचे निकष विहित केलेले आहेत. त्याचप्रमाणे संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दि.२२ सप्टेंबर,१९९४ च्या शासन निर्णयान्वये या प्रत्येक टप्प्यावरील पदांच्या ४थ्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार अंमलात आलेल्या वेतनश्रेणीच्या अनुषंगाने वेतनश्रेणीचे किमान टप्पे विहित केलेले आहेत.

२. ५व्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार वेतनश्रेणीच्या झालेल्या पुनर्रचनेच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक३ येथील दि.२२ सप्टेंबर,१९९४ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेले वेतनश्रेणीचे किमान टप्पे सुधारीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने ५ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींचा दि.१ जानेवारी,१९९६ पासून झालेल्या वेतनश्रेणीच्या पुनर्रचनेनंतर पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालांच्या सरासरीचे सर्वसाधारण निकष आणि वेतनाचे टप्पे खालील प्रमाणे विहित करण्यात येत आहेत. :-

१) शासन सेवेतील गट-अ मधील पहिल्या टप्प्यापर्यंतच्या पदावरील पदोन्नती ही "ज्येष्ठता अधीन पात्रता" या तत्वावर होत असल्याने या पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालांच्या सरासरी प्रतवारीचा निकष "ब" असा निश्चित करण्यात यावा.

२) गट-"अ" मधील पहिल्या टप्पानंतरच्या सर्व पदोन्नत्या " ज्येष्ठता अधिन निव्वळ गुणवत्ता (Strict selection/गुणवत्ता व ज्येष्ठता (Strict Selection with due regard seniority )"या तत्वावर करण्यात येत असल्याने त्यासाठी गोपनीय अहवालाच्या सरासरी प्रतवारीचे निकष खालीलप्रमाणे राहतील. -

(अ) गट-अ मधील ज्या पदांच्या वेतनश्रेणीचा किमान (Minimum) टप्पा रुपये १६,३९९ पर्यन्त आहे, त्या पदावरील पदोन्नतीसाठी ५ वर्षाच्या गोपनीय अहवालांची सरासरी प्रतवारी किमान "ब+" अशी असावी.

(ब) गट-अ मधील ज्या पदांच्या वेतनश्रेणीचा किमान (Minimum) टप्पा रुपये १६,४०० किंवा त्यापेक्षा अधिक आहे त्या पदावरील पदोन्नतीसाठी ५ वर्षाच्या गोपनीय अहवालांची सरासरी प्रतवारी किमान "अ" अशी असावी.

(क) मात्र ज्या पदांसाठी शासनाने स्वतंत्र आदेशान्वये गोपनीय अहवालांच्या सरासरीचे विविक्षीत निकष विहित केले असतील असे स्वतंत्र निकष ते वरील सर्वसाधारण निकषानुरुप नसले तरी अंमलात राहतील.

३. संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.२१ फेब्रुवारी,१९९४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ (३) मधील **"अत्युत्कृष्ठ"** गोपनीय अहवाल असलेल्या कर्मचा-यास निवडसूचीत वरचढपणा देण्याबाबतचे आदेश यापुढेही अंमलात राहतील.

४. सदर आदेश ५ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींनुसार सुधारीत केलेल्या वेतनश्रेणी अंमलात आलेल्या दिनांकापासून म्हणजेच दि.१ जानेवारी,१९९६ पासून अंमलात आल्याचे समजण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

बा. बा. नारायणकर
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक,मूळ शाखा,उच्च न्यायालय,मुंबई .
* प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई.
* प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई.
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई .
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई.
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद) मुंबई.
* राज्य निवडणूक आयुक्त,राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
* सचिव, अनुसूचित जमाती कल्याण समिती,विधान भवन, मुंबई.
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई.
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर.
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन,नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती.
*पत्राने.

---